याचिकाकर्ते सर्वश्री गणपतराव छोटूजी गभने व इतर १३ विरुध्द महाराष्ट्र शासन (रिट याचिका क्रमांक १८६८/२००५) प्रकरणी मा. उच्च न्यायालय, मुंबई खंडपीठ, नागपूर यांच्या दिनांक १४.०६.२०१७ रोजीच्या न्यायनिर्णयानुसार कार्यवाही करणेबाबत......

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : संकिर्ण-१९२३/प्र.क्र.९२/स्वासैक-१**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : १२ मे, २०२३.

**वाचा :-**

१) शासन निर्णय क्रमांक, संकिर्ण-२००५/प्र.क्र.१४१/२००५(२०१७)/स्वासैक-१, दिनांक ६.३.२०१८.
२) शासन निर्णय क्रमांक, संकिर्ण-२००५/प्र.क्र.१४१/२००५(२०१७)/स्वासैक-१, दिनांक १३.३.२०१९.
३) जिल्हाधिकारी कार्यालय, सोलापूर यांचे पत्र क्रमांक : डिसीबी-१/स्वा.सै.नि. वेतन/फरक, आरआर-२६८, दि. २७.०३.२०२३.

**प्रस्तावना :-**

केंद्र शासनाने गोवा मुक्ती संग्रामातील स्वातंत्र्य सैनिकांना केंद्र शासनाचे सन्मान निवृत्तीवेतन पूर्वलक्षी प्रभावाने मंजूर केल्याने, ज्या स्वातंत्र्य सैनिकांना केंद्र शासनाची स्वातंत्र्य सैनिक सन्मान निवृत्तीवेतन मंजूर झाली होती, त्यांना त्या दिनांकापासून राज्य शासनाची पूर्ण पेंन्शन देण्याऐवजी दरमहा रु. ५००/- प्रमाणे अतिरीक्त सन्मान निवृत्तीवेतन देण्यात यावे असे आदेश दि. १६/११/२००४ च्या शासन पत्रान्वये देण्यात आले होते.

२. दिनांक १६.११.२००४ रोजीच्या शासनपत्र विरोधात सर्वश्री गणपतराव छोटूजी गभणे व इतर १३ ( जिल्हा नागपूर ९, यवतमाळ ४, व वर्धा १ ) यांनी मा. उच्च न्यायालय, मुंबई खंडपीठ, नागपूर येथे रिट याचिका क्र.१८६८/२००५ दाखल केली होती. याप्रकरणी मा.उच्च न्यायालय, मुंबई खंडपीठ, नागपूर यांनी दिनांक १४.०६.२०१७ रोजी दिलेल्या न्यायनिर्णयाची अंमलबजावणी करण्याची कार्यवाही संदर्भ क्र. १ येथील शासन निर्णयान्वये करण्यात येत होती. दरम्यानच्या कालावधीत मा. उच्च न्यायालय, मुंबई खंडपीठ, नागपूर यांचा दिनांक १४/०६/२०१७ रोजीच्या न्यायनिर्णयाची पूर्णत्वाने अंमलबजावणी करण्याकरिता मा. उच्च न्यायालय मुंबई येथे अवमान याचिका क्र. ५३१/२०१८ दाखल करण्यात आली. यास्तव मा. उच्च न्यायालय, मुंबई खंडपीठ, नागपूर यांचा दिनांक १४/०६/२०१७ चा न्यायनिर्णय हा संदर्भ क्र.२ येथील शासन निर्णयान्वये सर्वच समान प्रकरणी लागू करण्यात आला आहे. याअनुषंगाने संदर्भ क्र.३ येथील पत्रान्वये केंद्र शासन निवृत्तीवेतनधारक स्वातंत्र्य सैनिक (वारस) पुढीलप्रमाणे आहेत :-

| अ.क्र | स्वातंत्र्य सैनिक यांचे जोडीदाराचे नाव | वारसाचे नाव | स्वा.सै.निवृत्तीवेतन धारक फरकाची देय रक्कम (रु.) |
|---|---|---|---|
| १ | कै. सरुबाई शंकर यादव | श्री. मणिक शंकर यादव (मुलगा) | ३,७४,७९०/- |
| २ | कै. मालन माधव यादव | श्री. कौशिक माधव यादव (मुलगा) | ८,१९,१४५/- |
| ३ | कै. यल्लव्वा सिद्राम श्रीनाळे | श्री. शाम सिद्राम श्रीनाळे (मुलगा) | १०,२८,०३४/- |
| **एकूण मागणी रक्कम** | | | **२२,२१,९६९/-** |

उपरोक्त वारसदारांना देय असलेल्या थकबाकीपोटी रु. २२,२१,९६९/- (रुपये बावीस लाख एकविस हजार नऊशे एकोणसत्तर फक्त) इतक्या निधीची मागणी केली आहे. त्याअन्वये, केंद्र शासन स्वातंत्र्य सैनिक यांच्या मृत्यु पश्च्यात त्यांचे कायदेशीर वारस म्हणून देय असलेल्या थकबाकीचे प्रदान करण्याकरिता रु.२२,२१,९६९/- इतका निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय :-**

याचिकाकर्ते सर्वश्री गणपतराव छोटूजी गभने व इतर १३ विरुध्द महाराष्ट्र शासन (रिट याचिका क्रमांक १८६८/२००५) प्रकरणी मा. उच्च न्यायालय, मुंबई खंडपीठ, नागपूर यांच्या दि.१४.०६.२०१७ रोजीच्या न्यायनिर्णयाची पूर्णत्वाने अंमलबजावणी होण्याच्या अनुषंगाने, केंद्र शासन निवृत्तीवेतनधारक स्वातंत्र्य सैनिक यांचे कायदेशीर वारस श्री. मणिक शंकर यादव (मुलगा), श्री. कौशिक माधव यादव (मुलगा) व श्री. शाम सिद्राम श्रीनाळे (मुलगा) यांना देय असलेल्या थकबाकीचे प्रदान करण्याकरिता जिल्हाधिकारी, सोलापूर यांना खालील तत्क्यामध्ये दर्शविल्याप्रमाणे रु. २२,२१,९६९/- (रुपये बावीस लाख एकवीस हजार नऊशे एकोणसत्तर फक्त) इतक्या निधीचे वितरण करण्यात येत आहे :-

| अ. क्र. | जिल्हा | मागणी करण्यात आलेला निधी (रु.) | संबंधित जिल्हाधिकारी यांचेकडे बीम्स प्रणालीवरील शिल्लक निधी (रु.) | शिल्लक निधीपैकी निवृत्तीवेतन फरकाची रक्कम अदा करण्यासाठी वापरावयाचा निधी (रु.) |
|---|---|---|---|---|
| (१) | (२) | (३) | (४) | (५) |
| १ | सोलापूर | २२,२१,९६९/- | ३६,६०,०००/- | २२,२१,९६९/- |
| **एकुण** | | | | **२२,२१,९६९/-** |

**२.** जिल्हाधिकारी, सोलापूर यांनी विहित कार्यपद्धतीनुसार थकबाकीचे प्रदान (स्वातंत्र्य सैनिक वारस) यांचे बँक खात्यामध्ये जमा करण्यात यावे व त्याबाबतचा अहवाल शासनास सादर करावा.

**३.** याप्रित्यर्थचा खर्च “मागणी क्र.ए-५, प्रधान लेखाशिर्ष-२२३५ सामाजिक सुरक्षा व कल्याण (६०) इतर सामाजिक सुरक्षा व कल्याण कार्यक्रम (१०२) सामाजिक सुरक्षा योजना (००) (०१) स्वातंत्र्य सैनिक व त्यांच्यावर अवलंबून असलेल्या व्यक्ती इत्यादींना निवृत्तीवेतन (अनिवार्य) ०४, निवृत्तीवेतनविषयक खर्च (२२३५ ००१५) या अर्थसंकल्पीय लेखाशीर्षाखाली चालू आर्थिक वर्षाच्या मंजूर तरतूदीतून भागविण्यात यावा व त्याच लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा संकेतांक क्र. २०२३०५१२१७४३४९५८०७ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

ASMITA VIJAY JAWDEKAR

Digitally signed by ASMITA VIJAY JAWDEKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT, 2.5.4.20=dce47c2325a773d2c5904e464f2dd7610434df0ea098c5a7b0f08fd23b9eaf45, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=ED3CD8A19B9EED13AD198DFE0907ADFD1D015C96DC950F8EFD986587A37546AF, cn=ASMITA VIJAY JAWDEKAR
Date: 2023.05.15 13:18:44 +05'30'

**( अस्मिता जावडेकर )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. महालेखापाल ( लेखा व अनुज्ञेयता ) महाराष्ट्र १, मुंबई / नागपूर
२. महालेखापाल ( लेखापरिक्षा ), महाराष्ट्र १, मुंबई / नागपूर
३. मा.अपर मुख्य सचिव (वि.चौ.अ.१) यांचे वरिष्ठ स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई-३२,
४. जिल्हाधिकारी, सोलापूर
५. जिल्हा कोषागार अधिकारी, सोलापूर
६. अधिदान व लेखा अधिकारी, सोलापूर
७. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, सोलापूर
८. कक्ष अधिकारी (का.२५), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. कक्ष अधिकारी, वित्त विभाग, (अर्थसंकल्प १४/व्यय-४) मंत्रालय, मुंबई
१०. निवडनस्ती ( स्वा.सै.क.१).